शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून राज्यात व्यावसायिक पदविका, पदवी व पदव्युत्तर पदविका अभ्यासक्रमांच्या नवीन संस्था सुरु करण्यास अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद,नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शासन मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.टीईएम-२०१८/प्र.क्र.१९५/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक: १९ जुलै, २०१८

**संदर्भ :** १) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्रराज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक २/एनजीसी/मान्यता/२०१८/५७७, दिनांक१४.०६.२०१८ वसहपत्र
२) उच्च व तंत्रशिक्षण विभागाचा शासन निर्णय क्र.टीईएम-२०१८/प्र.क्र.१९५/ तांशि-४, दिनांक ४.६.२०१८.
३) अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिनांक ७.५.२०१८ व १४.५.२०१८ रोजी उपलब्ध करुन दिलेली मान्यतेची यादी.
४) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्रराज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक २/एनजीसी/मान्यता/२०१८/५७७, दिनांक१०.०५.२०१८.
५) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक २/एनजीसी/मान्यता/२०१८/५८३, दिनांक १४.५.२०१८.

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचेकडून शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून राज्यात औषधनिर्माणशास्त्र व वास्तुशास्त्र पदवी अभ्यासक्रम व व्यवस्थापनशास्त्र पदव्युत्तर पदविका अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था सुरु करण्यास अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्या परवानगीस अनुसरुन शासन निर्णय निर्गमित करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक,तंत्र शिक्षण यांनी उपरोक्त पत्रान्वये सादर केला आहे. अखिल भारतीय तंत्र परिषद, नवी दिल्ली यांनी दिनांक ८.६.२०१८ च्या ई-मेलव्दारे शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करिता सुधारीत मान्यतेची यादी संचालक, तंत्र शिक्षण यांना उपलब्ध करुन दिलेली आहे. सदर सुधारीत यादी व यापूर्वी अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिनांक ७.५.२०१८ रोजी व दिनांक १४.५.२०१८ रोजीच्या ई-मेल व्दारे संचालक, तंत्र शिक्षण यांना उपलब्ध करुन दिलेल्या मान्यता यादीची पडताळणी केली असता एका नवीन पीजीडीएम संस्थेस मान्यता दिली असून सदर संस्थेची माहिती सोबतच्या Annexure A मध्ये सादर करण्यात आली आहे.

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिनांक ७.५.२०१८ च्या मान्यता यादीस अनुसरुन शासन निर्णय क्र.टीईएम-प्र.क्र.१९५/तांशि-४, दिनांक ४.६.२०१८ अन्वये शासन मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच दिनांक १४.५.२०१८ च्या मान्यता यादीस अनुसरुन संचालक, तंत्रशिक्षण यांनी शासनास प्रस्तावित केला असून शासन मान्यता दिली आहे. अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिनांक ८.६.२०१८ रोजी उपलब्ध करुन दिलेल्या मान्यता यादीस अनुसरुन शासन मान्यता देण्यासाठी सोबतच्या Annexure A मध्ये नमूद इन्स्टिटट्यूट ऑफ इन्फ्रास्ट्रक्चर स्टडीज ॲण्ड कन्स्ट्रक्शन मॅनेजमेंट, आंबी, तळेगाव, पुणे या नवीन संस्थेस शासन मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सोबत जोडलेल्या Annexture A मध्ये दर्शविल्याप्रमाणे राज्यात औषधनिर्माणशास्त्र व वास्तुशास्त्र पदवी अभ्यासक्रम व व्यवस्थापनशास्त्र पदव्युत्तर पदविका अभ्यासक्रमाच्या संस्था सुरु करण्यासशैक्षणिक वर्ष २०१८-१९पासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर मंजूरी कायम विनाअनुदान तत्वावर राहील.

२. प्रस्तुतबाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेशक्षमता Annexture Aमध्ये नमूद केल्याप्रमाणे राहील.

३. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४. सदर अभ्यासक्रमांच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम,२०१६मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/ संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५. सदर औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांसाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाची संलग्नता घेणे आवश्यक राहील.

६. संबंधित संस्थेने संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

७. सदर पदविका, पदवी व पदव्युत्तर पदविका अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमांच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

८. शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिटयूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

९. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत.तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

१०.संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा.प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

११. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

१२. याशिवाय संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१३. ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्धकरुन देण्यात आला असूनत्याचा संकेतांक २०१८०७१९१६००३२५२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.07.20 15:39:52 +05'30'

**( संजय धारुरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्रशासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय,पुणे.
३. संबंधित विद्यापीठांचे कुलसचिव, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
४. संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली- ११० ००१.
९. फार्मसी काऊन्सिल ऑफ इंडिया,कम्बाइन्डकाऊन्सिलिस्बिल्डिंग, कोटलारोड, ऐवान-इ-गालिबमार्ग, नवी दिल्ली-११० ००२.
१०.सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली.
११.विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई
१२.निवड नस्ती/तांशि-४

Annexure A

List of New Institute (Approved by AICTE A.Y. 2018-19)

Government Resolution No. TEM-2018/CR195/TE4 Date 19th Jully, 2018

| Sr. No. | CURRENT APPLICATION ID | Institute Code | Name of the Trust | Name of the Institute | Institute Address | Institute District | Institute Type | Minority Institute | Programme | Affiliating /University Department | Level of Course | Name of Course | Shift | Full Time/ part Time | Approved intake 2017-18 | Approved intake 2018-19 | Variation |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 1-3673951951 | New Institute | AUREOLE EDUCATION FOUNDATION, PRIDE ACCORD, 7th FLOOR, BANER ROAD, PUNE 411045 | INSTITUTE OF INFRASTRUCTUCTURE STUDIES AND CONSTUCTION MANAGEMENT | AT116/3, AMBI, · TAL-MAVAL, DIST-PUNE | Pune | Unaided Private | N | MANAGEMENT | THIS INSTITUTE | POST GRADUATE DIPLOMA | PROJECT MANAGEMENT | 1st Shift | Full Time | 0 | 60 | 60 |